**गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळाला कल्याणकारी योजना राबविण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध होणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२१/प्र. क्र.५३/महामंडळे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ जानेवारी, २०२२.

वाचा :-

(१) उद्योग, उर्जा, व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. असंका१११९/प्र.क्र.११०/काम-७अ, दिनांक १३ सप्टेंबर, २०१९
(२) उद्योग, उर्जा, व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. असंका-११२०/प्र.क्र.२०/काम-७अ, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२०
(३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण २०२०/ प्र.क्र.१३७/ महामंडळे, दिनांक २३ जुन, २०२१
(४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीसीएच-२०२०/ प्र.क्र.२८६/ शिक्षण-२, दिनांक १५ जुन, २०२१
(५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२०/प्र.क्र.९४/महामंडळे, दिनांक ४ ऑगस्ट, २०२१
(६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२०/प्र.क्र.९४/महामंडळे, दिनांक २१ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये साखर उद्योग हा एक प्रमुख उद्योग असुन खाजगी व सहकारी क्षेत्रातील मिळून जवळपास २०० साखर कारखाने कार्यरत आहेत. सदर कारखान्यांमध्ये राज्यातील विविध जिल्ह्यांतील अंदाजे ८ ते १० लाख ऊसतोड कामगार काम करतात. बहुतांश ऊसतोड कामगार हे राज्यातील ऊस उत्पादक जिल्ह्यांत स्थलांतरीत होऊन काम करतात.

ऊसतोड कामगारांना महाराष्ट्र राज्य साखर कारखाना संघाच्या स्तरावरुन होणाऱ्या सामंजस्य करारानुसार ऊस तोडणीची मजूरी व अन्य लाभ देण्यात येत असले तरीही ऊसतोड कामगारांना व त्यांच्या कुटुंबीयांना पर्यायाने त्यांच्या पाल्यांना सामाजिक व आर्थिक स्थैर्य तसेच, आरोग्य विषयक व शैक्षणिक सोयी-सुविधांचा लाभ मिळत नाही. या स्थलांतरीत ऊसतोड कामगारांचे पर्यायाने त्यांच्या

कुटूंबीयांचे जीवन अस्थिर व अत्यंत हलाखीचे असल्यामुळे त्यांचे जीवन सुखकारक करणे, राहणीमान उंचावणे व आयुष्य सुरक्षित करण्यासाठी विविध योजना राबविणे आवश्यक आहे. यासाठी गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळाची दिनांक १३ सप्टेंबर, २०१९ रोजी स्थापना करण्यात आली असून सदर महामंडळामार्फत या वर्गासाठी विविध योजना राबविण्याचा शासनाचा मानस आहे. या अनुषंगाने मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांनी दिनांक ८ मार्च, २०२१ रोजी अर्थसंकल्पीय भाषणात "स्व. गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळाला कल्याणकारी योजना राबविण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध व्हावा यासाठी साखर कारखान्यांकडून ऊस गाळपानुसार प्रति मेट्रीक टन १० रुपये आकारुन प्राप्त होणाऱ्या निधीच्या समप्रमाणात राज्य शासन दरवर्षी अनुदान देईल" अशी घोषणा केली आहे. गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळास ऊसतोड कामगारांच्या कल्याणासाठी, कल्याणकारी योजना राबविणेस्तव "ऊसतोड कामगार कल्याण निधी" म्हणून शेतकऱ्यांना एफ.आर.पी. (F.R.P.) प्रमाणे प्रति मेट्रीक टन द्यावयाच्या दरामध्ये कोणतीही कपात न करता दरवर्षी प्रति मेट्रीक टन १० रुपये प्रमाणे साखर कारखान्याकडून आकारण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. राज्यातील ऊसतोड कामगारांना विविध कल्याणकारी व सामाजिक सुरक्षा योजनांचा लाभ मिळवून देण्याकरीता गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळाला कल्याणकारी योजना राबविण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध व्हावा म्हणून साखर कारखान्यांकडून ऊस गाळपावर दरवर्षी प्रति मेट्रीक टन रु. १०/- आकारणी करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. ऊस नियंत्रण आदेश १९६६ मध्ये शेतकऱ्यांना देय असणाऱ्या ऊसाच्या रास्त व किफायतशीर दरांमधून (F.R.P.) कोणतीही कपात करणेची तरतूद नाही. त्यामुळे ऊसतोड कामगार महामंडळाला निधी उपलब्ध होणेकरीता साखर कारखान्यांकडून ऊस गाळपावर प्रति मेट्रीक टन रु.१०/- शेतकऱ्यांना देय असणाऱ्या रास्त व किफायतशीर दरांमधुन कपात करता येणार नाही. सदरचा खर्च हा साखर कारखान्यांनी त्यांच्या नफा-तोटा खाती दर्शवुन सदर रक्कम गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळाकडे जमा करावी. सदर रक्कम जमा करणे हे सहकारी व खाजगी साखर कारखान्यांना बंधनकारक राहील.

३. साखर कारखान्यांनी गाळप हंगाम सुरु झाल्यापासून ३१ डिसेंबर पर्यंत झालेल्या गाळपावरील देय होणारी रक्कम १५ जानेवारी पर्यंत जमा करावी व १ जानेवारी ते गाळप हंगाम संपेपर्यंत झालेल्या गाळपावरील देय होणारी रक्कम गाळप हंगाम संपल्यानंतर १५ दिवसांत जमा करावी.

४. सहकार विभाग व साखर आयुक्त, पुणे यांनी साखर कारखान्यांकडील निधी जमा होण्यासाठी साखर कारखान्यांच्या ऊस गाळपाचा तपशील व अनुषंगिक माहिती सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळास प्रतिवर्षी उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

५. साखर कारखान्यांनी ऊस गाळपानुसार प्रति मेट्रीक टन रु.१० प्रमाणे जमा होणारी रक्कम गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळाच्या बँक खात्यामध्ये जमा करावी.

६. ऊस गाळपानुसार प्रतिटन रु.१० आकारणी करुन जमा होणाऱ्या रकमेच्या समप्रमाणात शासनाचे अनुदान म्हणुन विहीत नियम व अटींचे पालन करुन गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळास उपलब्ध करुन दिले जाईल. सदर निधीवर सनियंत्रण सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे राहिल.

हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११/२५.स, दिनांक ९.१२.२०२१ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०२२०१०६१५०३३९५३२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DADA NAMDEV KOKADE

Digitally signed by DADA NAMDEV KOKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=81a9fee3e4fab545aa40bccc4ad46860efda515529664997a6109103e96f41e3, pseudonym=11F7570D4AD03CA9BC03A2C509E88C40A45864CC, serialNumber=D68C50095DDB3F1662543F4BA76407E09A62E57DC68B1B1DA9B6922646458AAE, cn=DADA NAMDEV KOKADE
Date: 2022.01.06 16:31:19 +05'30'

**(दा.ना.कोकडे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. उपाध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६.मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
८.मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई
९.मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.
१०.मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई
११. मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
१२.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय , मुंबई.
१३.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय ,मुंबई
१४. मा. प्रधानसचिव, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१५.मा.महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपुर

१६. सर्व विभागीय आयुक्त,(महसुल)
१७. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. आयुक्त, कामगार, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी/उपमुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
२१. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक व जिल्हा आरोग्य अधिकारी
२२. सर्व सहायक कामगार आयुक्त
२३. सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण
२४. सर्व जिल्हा महिला व बालविकास अधिकारी
२५. जिल्हा उपनिबंधक
२६. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
२७. निवड नस्ती- महामंडळे